**विशेष कार्यकारी अधिका-यांना नेमून दिलेल्या कर्तव्यांव्यतिरिक्त इतर वेळी त्यांना न बोलाविण्याबाबत..............**

महाराष्ट्र शासन,
शासन परिपत्रक क्र.सीआरटी २००३/८६८/पोल -११,
गृह विभाग,मंत्रालय, मुंबई - ३२,
दिनांक : ०३ ऑक्टोबर,२००३

**परिपत्रक :-** राज्यभरामध्ये सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक -विकाअ १७९९/प्र.क्र.२७१/९९/५,दिनांक ३०.११.९९ अन्वये, साक्षांकनाचे काम, उत्पन्नाचे दाखले, केवळ मुंबई शहरामध्ये ओळखपरेड साठी अशी कर्तव्ये पार पाडण्यासाठी राज्य शासनातर्फे विशेष कार्यकारी अधिका-यांची नेमणूक केली जाते. परंतु शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, घटक पोलीस कार्यालयांमार्फत विशेष कार्यकारी अधिका-यांना त्यांच्या विहित कर्तव्यांव्यतिरिक्त इतर कामांसाठी (मृत्यूपूर्व जबानी, इतर जबानी नोंदविणे) पाचारण केले जाते. हे सर्वथा अनुचित असून प्रचलित कायदयाच्या विरुध्दही आहे.

तरी या परिपत्रकाद्वारे राज्यभरातील सर्व पोलीस अधिका-यांना असे सूचित करण्यात येते की, विशेष कार्यकारी अधिका-यांना त्यांच्या नियमित कर्तव्यांव्यतिरिक्त अन्य कामासाठी पाचारण करु नये. या आदेशांचे उल्लंघन करणा-या पोलीस अधिका-यांना शिस्तभंगाच्या कठोर कारवाईस पात्र समजून प्रचलित नियमांनुसार कारवाई केली जाईल, याचीही कृपया नोंद घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(हर्षदिप कांबळे),
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व पोलीस अधिक्षक.